भारतीय पोलीस सेवेच्या विविध श्रेणीमध्ये
पदोन्नतीसाठी पात्रता गुण (Benchmark Score)
विहित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयपीएस-०३१५/प्र.क्र.६८/पोल-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १८ नोव्हेंबर, २०१५

**वाचा : सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक एईओ-१०१०/प्र.क्र.३७९/२०१०/दहा, दिनांक १९.१०.२०१०**

**प्रस्तावना**

भारतीय पोलीस सेवेतील विविध पदांवर पदोन्नतीसाठी केंद्र शासनाने दिनांक १५.०१.१९९९ व दिनांक १९.०७.२०१० च्या पत्रान्वये मार्गदर्शक सूचना विहित केलेल्या आहेत. या मार्गदर्शक सूचनांमध्ये पदोन्नतीच्यावेळी विचारक्षेत्रातील अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालांची छाननी केल्यानंतर कोणताही अधिकारी पात्र किंवा अपात्र असे सर्वसाधारण मूल्यांकन करावे, त्यासाठी कोणतेही पात्रता गुण (Benchmark Score) नसतील असे नमूद केले आहे.

केंद्र शासनाने भारतीय पोलीस सेवा (वेतन) नियम, २००७ अधिसूचित केले आहेत. या नियमांच्या नियम २ मध्ये राज्य शासनाने संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीसाठी पात्रता गुण भावी परिणामाने विहित करावे अशी तरतूद केली आहे. त्यानुसार, पात्रता गुण भावी परिणामाने विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

भारतीय पोलीस सेवा (वेतन) नियम, २००७ च्या नियम २ मधील तरतूदीच्या अनुषंगाने भारतीय पोलीस सेवेच्या महाराष्ट्र संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विविध श्रेणीतील पदोन्नतीसाठी पात्रता गुण खालीलप्रमाणे विहित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांसाठी सन २००७-२००८ पर्यत अत्युत्कृष्ट (Outstanding) उत्कृष्ट (Very Good), चांगला (Good) आणि साधारण (Average) अशा चार श्रेणींमध्ये कामाचे मुल्यमापन गोपनीय अहवालांमध्ये नोंदविले जात होते. तर २००८-२००९ पासून लागू झालेल्या कार्यमुल्यांकन अहवाल नियमांनुसार १ ते १० या स्केल वर गुणांच्या (Points) स्वरुपात मूल्यमापन करण्यात येते. केंद्र शासनाने दिनांक ०४.०६.२००९ च्या पत्रान्वये कार्यमुल्यांकन अहवाल पध्दतीमधील संख्यात्मक श्रेणी (Numerical Grading) खालीलप्रमाणे निश्चित केली आहे.

अत्युत्कृष्ट :- ८ ते १० गुण (पदोन्नती प्रयोजनासाठी ९ गुण धरावे.)
उत्कृष्ट :- ६ किंवा ६ पेक्षा जास्त परंतु ८ पेक्षा कमी (पदोन्नती प्रयोजनासाठी ७ गुण धरावे.)
चांगला :- ४ किंवा ४ पेक्षा जास्त परंतु ६ पेक्षा कमी (पदोन्नती प्रयोजनासाठी ५ गुण धरावे.)
साधारण :- ४ पेक्षा कमी गुण (पदोन्नती प्रयोजनासाठी शून्य गुण धरावे.)

३. सन २००८-०९ पूर्वीच्या गोपनीय अहवालात फक्त श्रेणी दिलेल्या असल्याने भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीसाठी पात्रता गुण विहित करताना सन २००८-०९ पूर्वीच्या गोपनीय अहवालांचे खालीलप्रमाणे संख्यात्मक गुणांमध्ये परिवर्तन करण्यात यावे.

अत्युत्कृष्ट (Outstanding) :- (पदोन्नतीसाठी ९ गुण धरावे.)
उत्कृष्ट (Very Good) :- (पदोन्नतीसाठी ७ गुण धरावे.)
चांगला (Good) :- (पदोन्नतीसाठी ५ गुण धरावे.)

साधारण (Average) :- (पदोन्नतीसाठी ३ गुण धरावे.)

४. भारतीय पोलीस सेवा अधिकाऱ्यांची पदोन्नतीसाठी पात्रता तपासताना त्यांच्या गुणांची परिगणना करण्यासाठी सन २००८-०९ पूर्वीच्या वर्षांसाठी उपरोक्त परिच्छेद ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे गुण विचारात घ्यावेत, तर सन २००८-०९ व त्यानंतरच्या वर्षांसाठी उपरोक्त परिच्छेद २ मध्ये प्रत्येक श्रेणीसमोर कंसात नमूद केलेले गुण विचारात घेण्यात यावेत.

५. वरीलप्रमाणे गोपनीय अहवालामधील श्रेणींचे गुणांमध्ये परिवर्तन केल्यानंतर कार्यमुल्यांकन अहवालाप्रमाणे निश्चित होणारे गुण लक्षात घेऊन, पदोन्नतीसाठी विचार करताना खालीलप्रमाणे पात्रता गुण (Benchmark Score) विहित करण्यात येत आहेत.

| ज्या श्रेणीत पदोन्नती द्यावयाची आहे, ती श्रेणी | किती वर्षांचे गोपनीय अहवाल/ कार्यमुल्यांकन अहवाल विचारात घ्यावेत | त्या अहवालांचे एकूण अधिकतम संभाव्य गुण | पदोन्नतीसाठी किमान पात्रता गुण (Benchmark Score) |
|---|---|---|---|
| पोलीस महासंचालक | १० | ९० | ७५ |
| अपर पोलीस महासंचालक | १० | ९० | ७० |
| अधिकालिक वेतनश्रेणी (विशेष पोलीस महानिरीक्षक व पोलीस उप महानिरीक्षक) | १० | ९० | ६५ |
| निवडश्रेणी | १० | ९० | ६० |
| कनिष्ठ प्रशासकीय श्रेणी | सदर श्रेणी ही अकार्यात्मक असल्यामुळे किमान पात्रता गुण विहित करण्याची आवश्यकता नाही. | | |
| वरिष्ठ समय श्रेणी | १<br>(परिविक्षा कालावधीनंतरचा एकच अहवाल उपलब्ध असतो म्हणून) | ९ | ५ |
| भापोसेमध्ये स्थायीकरण | १<br>(यासाठी एका वर्षाचाच मूल्यांकन अहवाल उपलब्ध असतो म्हणून) | ९ | ५ |

**टीप १:-** उपरोक्त तक्त्यात दर्शविलेल्या किमान पात्रता गुणांचा ( Benchmark Score) विचार करताना ज्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या सेवा कालावधीत एक वर्षापेक्षा अधिक कालावधीसाठी (सर्व प्रकारच्या रजेचा कालावधी वगळून) किमान १ पदस्थापना मराठवाडा किंवा विदर्भात केली असेल, त्यांना पदोन्नतीसाठी प्राधान्य राहील. म्हणजेच मराठवाडा किंवा विदर्भात किमान १ पदस्थापना केलेल्या अधिकाऱ्यांचा पदोन्नतीसाठी ज्या श्रेणीत विचार केला जात असेल त्या श्रेणीच्या निम्न श्रेणीसाठी विहित पात्रता गुणांच्या आधारे, पदोन्नतीसाठी पात्र ठरविण्यात यावे. म्हणजेच मराठवाडा किंवा विदर्भात किमान एक वर्ष वा अधिक कालावधीसाठी किमान एक पदस्थापना केलेल्या अशा अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीसाठी पात्रता गुण खालीलप्रमाणे असतील:-

पोलीस महासंचालक श्रेणीसाठी :- ७०,

अपर पोलीस महासंचालक श्रेणीसाठी :- ६५,
अधिकालिक वेतनश्रेणीसाठी :- ६० व
निवडश्रेणीसाठी :- ५५ असे असतील.

**टीप २:-** पदोन्नतीसाठी विचार करताना ज्या आार्थिक वर्षात पदोन्नतीसाठीची बैठक संपन्न होत असेल, त्या पूर्वीच्या संपूर्ण कार्यवाही होऊन अंतिम स्वरुपात प्राप्त झालेल्या कार्यमुल्यांकन अहवालाच्या वर्षासह एकूण दहा वर्षाचे उपलब्ध गोपनीय अहवाल/ कार्यमुल्यांकन अहवाल छाननी समिती विचारात घेईल.

६. उपरोक्त किमान पात्रता गुण (Benchmark Score), हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१११८११५८५०१९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

K P Bakshi

Digitally signed by K P Bakshi
DN: CN = K P Bakshi, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PLANNING DEPARTMENT
Date: 2015.11.18 17:34:24 +05'30'

**( के. पी. बक्षी )**
शासनाचे अपर मुख्य सचिव

**प्रत,**

१. मुख्य सचिव
२.मा.राज्यपाल यांचे सचिव
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
५. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
७. महासंचालक व पोलीस महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव
९. महाराष्ट्र संवर्गातील सर्व भारतीय पोलीस सेवा अधिकारी (महासंचालक व पोलीस महानिरिक्षक, म.रा., मुंबई यांच्यामार्फत)
१०. निवड नस्ती